**कार्यकारी अभियंता (स्थापत्य)**
**यांच्या बदल्या व नियुक्त्या**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन आदेश क्र. एलटीएस-११११/(२७४/२०११)/भाग-१/आ (वर्ग-१).....(२१)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ०६.०९.२०११

**आदेश**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोईच्या दृष्टीने जलसंपदा विभागातील कार्यकारी अभियंता (स्थापत्य) या संवर्गातील अधिकारी यांची बदली / नियुक्ती खाली दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे :-

| ा. ५. | अधिका-याचे नाव | सध्या धारण करीत असलेले पद | बदलीने नियुक्तीचे नवीन पद | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| . | श्री. एस.एस.ढमढेरे | सहाय्यक मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर), पुणे | का.अ. तथा अवर सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई | बदलीच्या अधिनियमातील कलम ४(४) व ४(५) नुसार श्री.स.द.कुलकर्णी यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदी |

२. श्री.स.द.कुलकर्णी यांच्या अन्यत्र पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येत आहेत. तसेच, श्री.ढमढेरे यांच्या बदलीने होणाऱ्या रिक्त पदावर अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येत आहेत.

३. संबंधित अधिका-यास कळविण्यात येते की, बदली करण्यांत आलेल्या अधिकाऱ्यास आपल्या नविन नियुक्तीच्या जागी हजर होण्यास कार्यमुक्त करावे. त्यांना नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिका-यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से (रजा) नियम १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिका-याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास संबंधित अधिका-याच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील क्रमांक २३ व क्रमांक (३)(३) चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यांत येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०९०६१६५३५१००१** असा आहे.

हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

०६।०९।११

**( डॉ.माधव वीर )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत : प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

प्रधान सचिव (जलसंपदा)/सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व महासंचालक, जलसंपदा विभाग, / सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
जलसंपदा विभागातील सर्व मुख्य अभियंते व सह सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर), पुणे
अधीदान व लेखा अधिकारी, मुंबई /संबधित जिल्हा कोषागार अधिकारी,
खाजगी सचिव, मा. मंत्री जलसंपदा (कृ.खो.पा.मं. वगळून), मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. मंत्री, जलसंपदा (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळ),मंत्रालय, मुंबई
खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
श्री.एस.एस.ढमढेरे, कार्यकारी अभियंता
सह सचिव (सेवा) / अवर सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासने - दक्षता-१/दक्षता-२/दक्षता-३ / गोपनीय शाखा (२ प्रती), जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.